**बारामती शहर, सबजेलच्या बांधकामास मागणी क्र. एच-८ ४०५९०९१२ अंतर्गत वितरित निधी ठेव अंशदान लेखाशिर्षाखाली वर्ग करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्र. जेएलएम ०२२१/प्र.क्र. ३५/तुरुंग-२**

दुसरा मजला, मुख्य इमारत, हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक: ३१ मार्च, २०२२.

**वाचा:**

१. गृह विभाग, शासन निर्णय क्र. जेएलएम-०२२१/प्र.क्र.३५/तुरुंग-२, दिनांक २६.२.२०२१.

२. गृह विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण ०२२१/VIP ०६/प्र.क्र.२१/तुरुंग-२, दिनांक ३१.३.२०२१.

३. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुण यांचे पत्र क्र. बीएलडी/बारामती सबजेल/वितरीत निधी/८४४३/ठेव अंशदान/१५५७/२२ कक्ष -६ (३), दिनांक २५.०२.२०२२.

**शासन निर्णय:**

संदर्भीय क्र. १ येथील दिनांक २६.२.२०२१ च्या शासन निर्णयान्वये बारामती शहर, सबजेल बांधकामाच्या रु.१४,९६,०३,०००/-इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. मागणी क्र. एच-८, मुख्य लेखाशिर्ष ४०५९ ०९१२ , "५३- मोठी बांधकामे" या उद्दिष्टाखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता सदर कामासाठी अर्थसंकल्पीय अंदाज २०२१-२२, भाग तीन परिशिष्टे "बी" २ बांधकामे-इमारती (white book) या पुस्तकामध्ये रु.१०,४७,२२,०००/- इतके अनुदान अर्थसंकल्पित केले आहे. सदर अनुदान सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात खर्च होणे शक्य नसल्यामुळे सन २०२२-२३ या वित्तीय वर्षात उपरोक्त बांधकामासाठी वापरण्याकरिता **"८४४३- ठेव अंशदान"** या लेखाशिर्षाखाली वर्ग करण्यास सदर शासन निर्णयाद्वारे मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. याविषयी "मागणी क्र. एच-८, मुख्य लेखाशिर्ष ४०५९ सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च (४०५९ ०९१२) (०१) (१०१)/(११) (०१) (तुरुंग) (योजनांतर्गत योजना)" अंतर्गत उपलब्ध रु. १०,४७,२२,०००/- इतका निधी वर्ग करणेबाबतची कार्यवाही विहीत कार्यपध्दतीनुसार संबंधित सार्वजनिक बांधकाम विभागाच्या कार्यालयाने करावी.

३. विषयांकित बांधकामासाठी **"८४४३- ठेव अंशदान"** या लेखाशिर्षाखाली वर्ग केलेला निधी सन २०२२-२३ मध्ये विहीत कार्यपध्दतीनुसार प्राथम्याने वापरणेबाबत कार्यवाही संबंधित कार्यालयाने करावी. तद्नंतर उपरोक्त बांधकामासाठी संबंधित लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ मध्ये अर्थसंकल्पित केलेल्या निधीची मागणी करण्यात यावी.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१३८/२०२२/व्यय-८, दिनांक २४.३.२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३३११९२५५४७८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Seema Tushar
Sawant

Digitally signed by Seema Tushar Sawant
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=15a6230fe20fd947aa83047f5deb85c95659ceb098e76eb25dd802b0518e7d63, pseudonym=24B046C8F2B9180A5B4EF51135F7CE222B0A37F0, serialNumber=9ED89E6C00B3FD549E02FB85DFE0767F96018A29CCAC79EC62AAFD247DECECE8, cn=Seema Tushar Sawant
Date: 2022.03.31 20:18:21 +05'30'

**(सीमा तु. सावंत)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
२) अपर मुख्य सचिव (अपील व सुरक्षा), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
३) सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
४) अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक,कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
५) कारागृह उपमहानिरिक्षक, पश्चिम विभाग,पुणे
६) महालेखापाल (लेखा परिक्षा/ लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई,
७) महालेखापाल, लेखा परिक्षा/ लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२ नागपूर,
८) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे,
९) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे,
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
११) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१२) निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई,
१३) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, बारामती,
१४) सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-२), मंत्रालय, मुंबई,
१५) कक्ष अधिकारी, (बियुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६) निवडनस्ती तुरुंग २, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

****************